**बीम्स प्रणालीस संलग्न आभासी स्वीय प्रपंजी लेखा राबविण्याकरीता महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळा अंतर्गत असणाऱ्या कार्यकारी अभियंत्यांना संवितरण अधिकारी घोषित करणे बाबत**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र.ईप्रशा २०१९/(३३३/२०१९)/लपा भाग-२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक २८/१२/२०२१

**वाचा**

१) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण/२०१४ /(३८/२०१४)/लेखा, दि. २२/०७/२०१५

२) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण/२०१७ /(१२/२०१७)/लेखा, दि. १६/०५/२०१७

३) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. ईप्रशा २०१९/(३३३/२०१९)/लपा भाग-२ दि.१३/१२/२०१९

४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१९/प्र.क्र.९२/कोषा-प्रशा ५, दि.०२/०३/२०२१

५) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. ईप्रशा २०१९/(३३३/२०१९)/लपा भाग-२ दि.०५/१०/२०२१

६) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. ईप्रशा २०१९/(३३३/२०१९)/लपा भाग-२ दि.२८/१२/२०२१

**प्रस्तावना**

जलसंपदा विभागा अंतर्गत महामंडळे व त्या अंतर्गत कार्यालयांच्या लेखे व अनुषंगिक अभिलेखांमध्ये एकसुत्रीपणा आणणे, त्या द्वारे उपलब्ध होणाऱ्या माहितीची मांडणी अधिक उपयुक्त व वापर सुलभ करणे व लेख्यांचे तत्परतेने अद्यावतीकरण करणे शक्य व्हावे याकरिता महामंडळांचे लेख्यांचे संगणकीकरण करण्यासंदर्भात आवश्यक सुचना संदर्भ क्र १ नुसार देण्यात आलेल्या आहेत.

शासन स्तरावरून महामंडळ व त्यांच्या अधिनिस्त क्षेत्रीय कार्यालयांना होणारे निधी वाटप व त्यातून केला जाणारा खर्च यावर प्रभावी नियंत्रण राखणे शक्य व्हावे. याद्दष्टीने लेख्यांचे संगणकीकरण करण्याच्या हेतूने माहितगार अधिकाऱ्यांची समिती संदर्भ क्र.२ नुसार स्थापन करण्यात आली आहे. त्यानुषंगाने बीम्स (Budget Estimation, Allocation and Monitoring System) सारखी प्रणाली विकसित करण्यासाठी राष्ट्रीय सुचना केंद्रामार्फत (National Informatics Center) Integrated Finance Management System (IFMS) ही नवीन प्रणाली विकसित करण्यात आली आहे.

संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयानुसार, सदर प्रणाली १ एप्रिल, २०२१ पासून महाराष्ट्र कृष्णा खोरे महामंडळासाठी पथदर्शी स्वरूपात व १ ऑगस्ट, २०२१ पासून सर्व पाटबंधारे महामंडळात प्रायोगिक तत्वावर वापरणे आवश्यक आहे. दि.०१ एप्रिल, २०२२ पासून पुढे जलसंपदा विभागांतर्गत कार्यरत सर्व पाटबंधारे महामंडळांना सदर प्रणालीचा वापर अनिवार्य राहील.

त्याप्रमाणे सदर प्रणाली कार्यान्वित करण्यापूर्वी महाराष्ट्र कृष्णा खोरे महामंडळा अंतर्गत असणाऱ्या ३३ विभाग प्रमुखांना संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णय अन्वये संवितरण अधिकारी घोषित करण्यात आले आहे. तसेच संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णय अन्वये इतर ९ विभाग प्रमुखांना संवितरण अधिकारी घोषित केले होते. तथापि सदर शासन निर्णयातील संवितरण सांकेतांक चुकीचे असल्याची बाब निदर्शनास आल्यामुळे संदर्भ क्र.५ चा शासन निर्णय अधिक्रमित करून, सुधारित संवितरण सांकेतांक अंतर्भूत करून सदरहू प्रणाली महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळा अंतर्गत असणाऱ्या ९ विभाग

प्रमुखांना संवितरण अधिकारी घोषित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. याबाबत शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

१. महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे या कार्यालयाकडील सद्य:स्थितीत कार्यान्वित असलेले स्वीय प्रपंजी लेखा खाते क्र.८५४१ योजना सांकेतांक क्र.८४४३००८१ कोषागार कार्यालय पुणे येथे आहे. सदर स्वीय प्रपंजी लेख्यामधून निधी आहरणासाठी कार्यकारी संचालक यांना प्राधिकृत करण्यात आले आहे. परंतु नवीन विकसित होणाऱ्या Integrated Finance Management System (IFMS) या प्रणालीसाठी महामंडळ अधिनिस्त कार्यकारी अभियंता यांचेकडून पुणे कोषागारातील महामंडळाच्या स्वीय प्रपंजी लेख्यामधून रक्कम वितरीत करणे आवश्यक असल्याने सोबत जोडलेल्या यादीतील ९ कार्यकारी अभियंता यांना “आभासी स्वीय प्रपंजी लेखा अंतर्गत संवितरण अधिकारी” (Disbursing Officer under PLA Account) घोषित करण्यात येत आहे. तसेच त्यांचा संवितरण सांकेतांक सोबत दिलेल्या यादीमध्ये समाविष्ट करण्यात आलेला आहे.

२. वित्त विभागाकडून, वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१९/प्र.क्र.९२/कोषा-प्रशा ५, दिनांक ०२/०३/२०२१ नुसार पुढील कार्यवाही करावी असे निर्देश प्राप्त झाले आहेत. त्याप्रमाणे कार्यवाही करण्याची दक्षता सर्व महामंडळाकडून तसेच ई-प्रशासन मंडळाकडून घेणेत यावी.

३. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ/२१८/२०२१/कोषा-प्रशा ५, दि.०९/१२/२०२१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११२२८१४५१५७३१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्रचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Rekha Ajit Bhawar
Date: 2021.12.28 14:53:13 +05'30'

(रेखा भवार)

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य.
३. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य., मुंबई.
४. विरोधी पक्ष नेते विधान परिषद / विधानसभा.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (ले व को), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळ.
१३. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१४. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
१५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१६. कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/जळगांव/औरंगाबाद/ठाणे.
१७. मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे.
१८. आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. अधीक्षक अभियंता, जलसंपदा ईप्रशासन मंडळ, पुणे.
२०. कार्यासने अर्थ-१/२/लेखा/निवसं, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. लपा कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्र.ईप्रशा २०१९/(३३३/२०१९)/लपा भाग-२ दि.२८/१२/२०२१ चे सहपत्र

## महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे

**पुणे कोषागारातील स्वीय प्रपंजी खाते क्र.२२०१००८५४१ योजना अंतर्गत कार्यकारी अभियंता यांना स्वीय प्रपंजी लेखा अंतर्गत संवितरण अधिकारी संकेतांक वाटप करण्यात आला आहे. तो खालील तक्यात रकाना क्र.** ६ **मध्ये नमुद केला आहे.**

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | कार्यालयाचा पत्ता | संबंधित कार्यकारी अभियंत्यांचा मोबाईल क्रमांक | Existing DDO Code | संवितरण अधिकारी सांकेतांक (Disbursing Officer Code) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | कार्यकारी अभियंता, पुणे पाटबंधारे विभाग, पुणे | नवीन प्रशासकीय इमारत, साधू वासवानी चौक, पुणे | ९८२३२८२९०७ | २२०१००३९०५ | २२०१३४८५४१ |
| २ | कार्यकारी अभियंता, निरा उजवा कालवा विभाग, फलटण | अधिकारगृह, फलटण, ता.फलटण जि.सातारा | ९९२२१०७६६९ | २३१०००३९७५ | २२०१३५८५४१ |
| ३ | कार्यकारी अभियंता, सांगली पाटबंधारे विभाग, सांगली | वारणाली वसाहत, विश्रामबाग, सांगली ता.मिरज जि.सांगली | ९८२२२६४८९३ | २४०१००३९०५ | २२०१३६८५४१ |
| ४ | कार्यकारी अभियंता, कुकडी पाटबंधारे विभाग क्रमांक १, नारायणगाव | मु.पो.नारायणगाव ता.जुन्नर, जि.पुणे | ९८२२०४१४३१ | २२०७००४२८७ | २२०१३७८५४१ |
| ५ | कार्यकारी अभियंता, कुकडी पाटबंधारे विभाग क्रमांक २, श्रीगोंदा | मु.पो.श्रीगोंदा, ता.श्रीगोंदा, जि.अहमदनगर | ९८९०९९८४६९ | ५४१२००४२८८ | २२०१३८८५४१ |
| ६ | कार्यकारी अभियंता, चासकमान प्रकल्प विभाग, पुणे | नवीन प्रशासकीय इमारत, साधू वासवानी चौक, पुणे | ९४०४९२५६२७ | २२०१००३९६३ | २२०१३९८५४१ |
| ७ | कार्यकारी अभियंता, भीमाविभाग क्रमांक २, सोलापूर | भीमा विकास विभाग क्रमांक २, मोहितेनगर, होटगी रोड, सोलापूर ४१३००३ | ८६०००५३६३४ | २५०१००४१८९ | २२०१४०८५४१ |
| ८ | कार्यकारी अभियंता, भीमा पाटबंधारे विभाग, पंढरपूर | उजनी वसाहत, चंद्रभागा नगर, चंद्रपूर | ९४२२०६९६४३ | २५०९००४१७२ | २२०१४१८५४१ |
| ९ | कार्यकारी अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे विभाग, (उत्तर), कोल्हापूर | सिंचन भवन, कोल्हापूर - | ९९२२९५५२२९ | २६०१००३९०५ | २२०१४२८५४१ |